**औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्राचार्य/ उपप्राचार्य व आदिवासी आश्रम औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रकल्प अधिकारी यांचे नांवे वैयक्तिक लेखा/स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्यास मंजूरी मिळणेबाबत....... .**
**"(लेखाशिर्ष २२३०-कामगार व सेवायोजन )."**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२४११/२०१४/प्र.क्र. १/व्यशि-२.
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २२ जून, २०१५.

**वाचावे :-** (१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक अर्थसं-२४११/२०१४/प्र.क्र. १/व्यशि-२, दिनांक ३० ऑगस्ट, २०१४.
(२) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र, मुंबई कार्यालयाकडील अनौ. संदर्भ क्रमांक : No. TM/Ch. 2/UOR/HTED/2014-15/974, Dated 18.12.2014.
(३) शासन शुध्दीपत्रक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक अर्थसं-२४११/२०१४/प्र.क्र. १/व्यशि-२, दिनांक १ जानेवारी, २०१४.
(४) प्रभारी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : १३/लेखा/२०१४-१५/१०८८, दिनांक ०२.१२.२०१४.
(५) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र, मुंबई कार्यालयाकडील अनौ. संदर्भ क्रमांक : No. TM/Ch. 2/UOR/H & TE Department/2015-16/293, Dated 01.06.2015.

**शासन परिपत्रक :-**

व्यवसाय प्रशिक्षण व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्राचार्य व शासकीय आदिवासी आश्रम औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्रकल्प अधिकारी यांच्या नावे स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA) उघडण्यास वित्त विभागाच्या सहमतीने व अनौ. संदर्भ : ४४/१४/को.प्र. ५, दिनांक ३०.०६.२०१४ अन्वये संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक (१) अन्वये मंजूरी देण्यात आली आहे. सदर मंजूरी ही शासन निर्णयात नमूद केलेल्या अट क्रमांक (१) ते (८) व महालेखापालांच्या मान्यतेस अधीन राहून देण्यात आली आहे. तसेच, प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र, मुंबई कार्यालयाने संदर्भाधीन क्रमांक (२) च्या अनौ. संदर्भान्वये स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA) उघडण्यास महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील खंड-१ च्या नियम क्रमांक-४८८ एवं ४९४ (सी) अनुसार दिलेल्या सहमतीने (Concurrence) संदर्भाधीन शासन शुध्दीपत्रक क्रमांक (३) निर्गमित करण्यात आले आहे.

दरम्यान, प्रभारी संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (४) अन्वये तालुक्यातील उपकोषागार कार्यालयातील आर्थिक व्यवहार सोयीचे होण्याकरिता शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३० ऑगस्ट, २०१४ च्या "प्रपत्र-अ" मधील अ.क्र. १२ समोरील औद्योगिक प्रशिक्षण संस्था दोडामार्ग समोर "उपकोषागार सावंतवाडी ऐवजी दोडामार्ग" व अ.क्र. ३५ समोरील औद्योगिक प्रशिक्षण संस्था फुलंब्री समोर "उपकोषागार तळोदा ऐवजी फुलंब्री" करण्यास विनंती केली आहे. संचालनालयाच्या विनंतीनुसार वरील प्रमाणे उपकोषागारांस बदल करण्यास प्रधान महालेखापाल, मुंबई कार्यालयाच्या संदर्भाधीन क्रमांक (५) च्या अनौ. संदर्भान्वये अनुमती घेण्यात आली आहे.

व्यवसाय प्रशिक्षण व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना कळविण्यात येते की, त्यांच्या अधिपखालील औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्राचार्य व शासकीय आदिवासी आश्रम औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्रकल्प अधिकारी यांच्या नावे स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA) उघडतांना अनुक्रमे वित्त विभाग व प्रधान महालेखापाल कार्यालयाने संदर्भाधीन क्रमांक (२) दिनांक १८.१२.२०१४ च्या अनौ. संदर्भान्वये दिलेल्या सर्व अटी व शर्तीचे पालन करण्याबाबतच्या सूचना सर्व संबंधितांना देण्यात याव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०६२२१५२१३५३००८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Ramchandra Wanjari

Digitally signed by Vilas Ramchandra Wanjari
DN: CN = Vilas Ramchandra Wanjari, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Higher & Technical Education
Date: 2015.06.22 15:23:47 +05'30'

**( विलास रा. वंजारी )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) महालेखापाल ( लेखापरीक्षा) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६) सर्व संबंधित जिल्हा कोषागार/उपकोषागार अधिकारी ( संचालनालयामार्फत).
७) कोप्र-५ कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) साशि-१ कार्यासन, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती ( व्यशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.